राज्य माहिती आयोग,नाशिक  येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती
**श्री.राजेंद्र रघुनाथ बोडके, मूळप्रतवाचक, शासकीय मुद्रणालय, मुंबई**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्र. संकिर्ण २०२२/ प्र.क्र.३१/ सहा**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक ०४ मे, २०२२**

वाचा: १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७ / कार्या-१२, दिनांक १७.१२.२०१६
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१० / कार्या-१२, दिनांक १६.२.२०१८

## शासन आदेश

संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये, शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित केले असून प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपध्दती विहित केली आहे.

२. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार, उद्योग,उर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय मुद्रणालय, मुंबई या कार्यालयात मूळप्रतवाचक पदावर कार्यरत असलेले श्री. राजेंद्र रघुनाथ बोडके यांच्या सेवा, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशाकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२ यांच्या अधिपत्याखालील राज्य माहिती आयोग, नाशिक या कार्यालयातील लिपिक-टंकलेखक या पदावर प्रथमत: तीन वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

(अ) श्री. राजेंद्र रघुनाथ बोडके, मूळप्रतवाचक ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला तो आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिका-यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिका-याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिका-याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचा-यास प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा....इ) नियम, १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन, उद्योग विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती बाबत सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-६) यांच्याशी सहमतीने ठरवाव्यात.

४. श्री. राजेंद्र रघुनाथ बोडके, मूळप्रतवाचक यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी उद्योग,उर्जा व कामगार विभाग व अधिपत्याखालील संबंधित कार्यालय यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५०४१७०२२३९९०७ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार.

JANA JIVA VALVI

Digitally signed by JANA JIVA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=816d3fe4c7042f66b4ac73a1f0087cd8fda3e115d42dc8b54c0e783064c80dc1, pseudonym=BC7303629AB7AFCA8CE15C55D2BEFE77F3006E6E, serialNumber=FD6F9785FE220B2C0F30D422D401E2DFC838A0D9EC621401534F5B36EAF57F26, cn=JANA JIVA VALVI
Date: 2022.05.04 17:03:27 +05'30'

**(ज.जि.वळवी)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, मुंबई
३. उपसचिव (उद्योग-४), उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन, संचालनालय,मुंबई
- यांना कळविण्यात येते की, सदर शासन आदेशाच्या अनुषंगाने श्री. राजेंद्र बोडके, मूळप्रतवाचक यांना राज्य माहिती आयोग, नाशिक कार्यालयात रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे.
५. श्री. राजेंद्र रघुनाथ बोडके, मूळप्रतवाचक,शासकीय मुद्रणालय,मुंबई
(संबंधित विभागामार्फ़त)
६. कार्यासन सहा संग्रहार्थ.